राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत संस्थांकरीता संगणक/प्रिंटर/लॅपटॉप इत्यादी च्या खरेदीसाठी सन २०२०-२१ च्या आर्थिक वर्षाकरीता प्रकल्प अंमलबजावणी आराखडा (PIP) FMR Code १६.३.४ या अंतर्गत प्राप्त झालेल्या निधीमधून खरेदीस प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-१२२०/प्र.क्र.४०/आरोग्य-७**
१० वा मजला , गो. ते. रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : १० डिसेंबर, २०२०.

**वाचा :-**

१) सहसंचालक (अतांत्रिक), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांचे पत्र क्र.राआअ/आयटी कक्ष/संगणक खरेदी/३६५८३-८५/२०२०, दि.२४.०८.२०२०
२) सार्वजनिक आरोग्य विभाग, पत्र क्र.प्रशामा-१२२०/प्र.क्र.४०/आरोग्य-७, दिनांक २८.०८२०२०.
३) सहसंचालक (अतांत्रिक), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांचे पत्र क्र.राआअ/आयटी कक्ष/संगणक खरेदी/३७८९१-९२/२०२०, दि.३१.०८.२०२०
४) आयुक्त (आरोग्य सेवा) तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांच्याकडील दिनांक १४.०७.२०२० च्या रोजीची मान्य टिप्पणी.

**प्रस्तावना:-**

सहसंचालक (अतांत्रिक), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांचे दिनांक २४.०८.२०२० च्या प्रस्तावातील राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत संस्थांकरीता संगणक/प्रिंटर/लॅपटॉप इत्यादी च्या खरेदीसाठी सन २०२०-२१ च्या आर्थिक वर्षाकरीता प्रकल्प अंमलबजावणी आराखडा (PIP) FMR Code १६.३.४ या अंतर्गत रू.१४९८.८० लक्ष इतके अनुदान मंजूर आहे. त्यापैकी सदर खरेदीकरीता अंदाजित रु. १४७८.८० लक्ष इतक्या रकमेचा खर्च करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत संस्थांकरीता संगणक/प्रिंटर/लॅपटॉप इत्यादी च्या खरेदीसाठी सन २०२०-२१ च्या आर्थिक वर्षाकरीता प्रकल्प अंमलबजावणी आराखडा (PIP) FMR Code १६.३.४ या अंतर्गत रू.१४९८.८० लक्ष निधीमधून सदर खरेदीकरीता अंदाजित रू.१४७८.८० लक्ष इतक्या रकमेच्या खर्चास प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

## विवरणपत्र
## अ-अनुदानाचा तपशिल

| Sr. No. | FMR Code | Name of Particulars | Name of Item | Quantity | Approx.Cost | Total Cost in AA |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | १६.३.४ (PIP २०२० -२१) | Procurement of Computer/Printer/ UPS/Laptop/VSAT | Computer | २११५ | ५०००० | १०५७५०००० |
| | | | Laptops | १८१ | ६०००० | १०८६०००० |
| | | | Printers | ९०२ | १५००० | १३५३०००० |
| | | | Scanners | ४७९ | ३०००० | १४३७०००० |
| | | | UPS | १६८५ | २००० | ३३७०००० |
| TOTAL | | | | ५३६२ | १५७००० | १४७८८०००० |

०२. तसेच उपरोक्त राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत संस्थांकरीता संगणक/प्रिंटर/लॅपटॉप इत्यादी च्या खरेदीसाठी सन २०२०-२१ च्या आर्थिक वर्षाकरीता प्रकल्प अंमलबजावणी आराखडा (PIP) FMR Code १६.३.४ या अंतर्गत प्राप्त झालेल्या निधीमधून रु.१४७८.८० लक्ष इतक्या रकमेच्या खरेदीस प्रशासकीय मान्यता मिळण्यासाठीचा प्रस्तावास अतिरिक्त अभियान संचालक आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांनी त्यांच्या दिनांक १४.०७.२०२० च्या टिप्पणीद्वारे मान्यता दिली आहे.

०३. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अनु क्रमांक ४, नियम क्र. ७ अन्वये अवजारे, किरकोळ साधन सामग्री आणि उपक्रम संच विकत घेण्यास मंजूरी देण्यासाठी प्रशासनिक विभागास पूर्ण अधिकार प्रदान करण्यात आले आहेत. त्यानूसार खालील अटींच्या अधीन राहून प्रस्तावास मान्यता देण्यात यावी, असे प्रस्तावित आहे.

१) सदर संगणक/प्रिंटर/लॅपटॉप इ.सामुग्रीची आवश्यकता / मागणी याची शहानिशा / खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच सदर बाबींच्या खरेदीसाठी निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

२) सदरहू संगणक/प्रिंटर/लॅपटॉप इ.सामुग्रीचे विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. खरेदी करावयाच्या बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical specification) संबंधित तज्ञांनी (तांत्रिक समिती / अधिकारी) यांनी मान्य केलेल्या विनिर्देशानुसार असावेत. तसेच, सदर तांत्रिक विनिर्देश (Technical specification) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. पीआयपी मध्ये मंजूर असलेल्या बाबींच्या तांत्रिक विर्निदेशानुसार मागणीपत्र पाठविण्याची जबाबदारी संबंधीत कार्यक्रम प्रमुखांची राहिल. प्रस्तावातील समाविष्ट असलेल्या बाबींचीच खरेदी करण्यात यावी.

३) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर, २०१६ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या

कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारीत नियमपुस्तिका यामधील तरतूदीनुसार विहित खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी.

४) प्रशासकीय मान्यता देताना प्रस्तावित खरेदीचे दर हे अंदाजित आहेत. त्यामुळे खरेदी प्रक्रियेअंती दर निश्चित करण्यात यावा. सदर दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधित पुरवठादाराने या बाबीचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे, त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

५) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींची पुरवठापूर्व/ पुरवठानंतर नमुना तपासणी (pre/Post dispatch random sample inspection) करुन उचित व योग्य विनिर्देश (specification) असलेल्या वस्तुंचीच खरेदी करण्यात येईल, याची खात्री करण्यात यावी.

६) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींचा पुरवठा झाल्यानंतर त्यांची साठवणूक व वितरण (storage & distribution) करणे तसेच, पुरवठा साखळी व्यवस्थापन (Supply chain management) आणि वस्तुसूची व्यवस्थापन (Inventory Management) योग्य पध्दतीने करुन सदर बाबी विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहीत मुदतीत वापर होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

७) सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात सदर खरेदीकरीता अंदाजित रु. १४७८.८० लक्ष इतका खर्च अपेक्षित असून सदरचा खर्च राष्ट्रीय आरोग्य अभियान सन २०२०-२१ चा प्रकल्प अंमलबजावणी आराखडा (PIP) FMR Code १६.३.४ या अंतर्गत असलेल्या रू. १४९८.८० लक्ष अनुदानातून भागविण्यात यावा. सदरची खरेदी प्रशासकीय मंजुरीच्या विहित कालावधीत पूर्ण होईल याची दक्षता घ्यावी.

८) प्रस्तावित साधन सामुग्रीची सद्यस्थिती, उपलब्धता, आवश्यकता, मागणी याचा अभ्यासक व्यवस्थापन करुन आवश्यकतेनूसार खरेदी करण्याची जबाबदारी व्यवस्थापकीय संचालक यांची राहील. तसेच, या बाबींच्या खरेदी द्विरुक्ती (Duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

९) संपूर्ण खरेदी प्रक्रिया राबविताना केंद्रिय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे.

१०) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/भाग-२/२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८,भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अ.क्र.४ नियम क्र.७ समोरील स्तंभ क्र.६ येथील अटींची पूर्तता करण्यात यावी.

११) खरेदी प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर खरेदी समितीच्या मान्यतेनंतरच पुरवठा आदेश निर्गमित करण्यात यावेत.सदर प्रकरणी सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय क्र.खरेदी -

२०१६/प्र.क.२४०/आरोग्य-८ दिनांक २६ जुलै,२०१७ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार कार्यवाही करण्यात यावी.

०४. उपरोक्त अनुक्रमांक १ ते ११ येथे नमूद अटींची पूर्तता करण्याची व खरेदी नियमानुसार व आवश्यकते प्रमाणे आहे हे सुनिश्चित करण्याची संपूर्ण जबाबदारी आयुक्त, आरोग्य सेवा व अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, संचालक, आरोग्य सेवा संचालनालय व कार्यक्रम प्रमुख यांची राहील.

०५. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अनु क्रमांक ४, नियम क्र. ७ अन्वये अवजारे, किरकोळ साधन सामग्री आणि उपक्रम संच विकत घेण्यास मंजूरी देण्यासाठी प्रशासनिक विभागास पूर्ण अधिकार प्रदान करण्यात आले आहेत. त्यानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०११०९१३१७४५१५१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Milind Raghunath Kulkarni

Digitally signed by Milind Raghunath Kulkarni
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=438fa70bb728385b5c81bde24450c11d5ce0d99ed18a61fb5b1685722e2c2c03, cn=Milind Raghunath Kulkarni
Date: 2020.12.10 15:42:14 +05'30'

**( मिलिंद कुळकर्णी )**
**अवर सचिव महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
२) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य संचालनालय, मुंबई.
३) अतिरिक्त संचालक (आरोग्य सेवा), राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे.
४) सर्व सह संचालक (आरोग्य सेवा संचालनालया मार्फत)
५) सर्व सहसचिव/उपसचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग.
६) उप संचालक, सर्व मंडळ कार्यालये.
७) सर्व जिल्हा शल्य चिकित्सक (FWB मार्फत)
८) सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी (FWB मार्फत)
९) निवडनस्ती (आरोग्य-७)